**घरभाडे भत्ता व स्थानिक पूरकभत्त्याच्या प्रयोजनार्थ शहरांचे/ गावांचे पुनर्वर्गीकरण**

---

**स्पष्टीकरण**

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग
शासन परिपत्रक,क्र. घभाभ-१००३/प्र.क्र.४५/सेवा-५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १० नोव्हेंबर,२००३

पहा:-(१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.घभाभ-१०९८/प्र.क्र.८२/९८/सेवा-५,
दिनांक ११ डिसेंबर,१९९८.

(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.घभाभ-१०९८/सीआर-६२/एसईआर-५,
दिनांक १५ फेब्रुवारी,१९९९

**परिपत्रक**

राज्य शासनाने घरभाडे भत्ता / स्थानिक पूरकभत्ता देण्याच्या प्रयोजनासाठी राज्यातील शहरांचे / गांवाचे केलेले वर्गीकरण आणि प्रशासनिक सोयीच्या दृष्टीकोनातून राज्यातील नगरपरिषदांचे केलेले वर्गीकरण हया दोन भिन्न बाबी आहेत. वरील (१) येथे नमूद केलेल्या निर्णयानुसार कर्मचाऱ्यांना घरभाडेभत्ता / स्थानिक पूरकभत्ता देतांना तो या भत्त्यांच्या प्रयोजनासाठी केंद्र शासनाने केलेल्या वर्गीकरणाच्या आधारे देण्यात येतो.कर्मचाऱ्यांना वरील भत्ते देतांना प्रशासनिक सोयीच्या दृष्टीकोनातून राज्यातील नगरपरिषदांचे केलेले वर्गीकरण विचारात घेऊ नये,अशा आशयाच्या सूचना वरील (२) येथील परिपत्रकान्वये (प्रत संलग्न) निर्गमित करण्यात आल्या आहेत.

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, या परिपत्रकान्वये प्रसृत करण्यात आलेल्या सूचनांचे काळजीपूर्वक अवलोकन केले जात नाही. ज्या-ज्या वेळेस राज्य शासन राज्यातील नगर परिषदांचे प्रशासनिक सोयीच्या दृष्टीकोनातून पुनर्वर्गीकरण करते,त्या-त्या वेळेस असे पुनर्वर्गीकरण करण्यात आलेल्या नगर परिषदांपैकी ज्यांना वरील वर्ग प्राप्त झाला आहे,अशा नगरपरिषदांच्या हद्दीत काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांकडून नव्या वर्गीकरणानुसार सुधारित दराने घरभाडे भत्त्याची मागणी केली जाते. तसेच तेथील कार्यालयांकडून नव्या वर्गीकरणानुसार वाढीव दराने घरभाडे भत्ता प्रदान करण्याविषयी धारणा व्यक्त करुन शासनाचे मार्गदर्शन अपेक्षिले जाते.

H-934-(10,000+20-11-03)1

या परिपत्रकान्वये या विषयी सर्व संबंधिताचे लक्ष पुन्हा वरील (२) येथील आदेशांकडे वेधण्यात येत आहे. यासंदर्भात पुन्हा स्पष्ट करण्यात येते की, घरभाडे भत्ता / स्थानिक पूरकभत्ता मंजूर करण्यासाठी शासनाच्या वित्त विभागाच्या आदेशाद्वारे राज्यातील शहरांचे / गांवाचे केलेले वर्गीकरण हे प्रशासनिक सोयीच्या दृष्टीकोनातून शासनाच्या नगर विकास विभागाच्या आदेशाद्वारे नगर परिषदांच्या केलेल्या वर्गीकरणापासून सर्वस्वी भिन्न आहे. प्रशासनिक सोयीच्या दृष्टीकोनातून नगर परिषदांचे अंमलात असणारे वर्गीकरण बदलले तरी या बदलामुळे त्या ठिकाणी कार्यरत असणाऱ्या कर्मचाऱ्यांना मिळणाऱ्या घरभाडेभत्त्याच्या वा स्थानिक पूरक भत्त्याच्या दरात कोणताही बदल होत नाही.

तेव्हा,काही ठिकाणी नगर विकास विभागाच्या आदेशाद्वारे नगर परिषदांच्या केलेल्या वर्गीकरणाचा चूकीचा आधार घेऊन सुधारीत दराने उक्त भत्ते दिले जात असल्यास ते त्वरीत बंद करण्यात यावेत आणि वित्त विभागाच्या दि.११.१२.९८च्या आदेशाद्वारे राज्यातील शहरांचे / गांवाचे केलेले वर्गीकरण लक्षात घेऊन त्यानुसार अनुज्ञेय असलेल्या दराने भत्त्यांचे प्रदान करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शु. श. कारेकर,
**शासनाच्या उप सचिव**

प्रति

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई

महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनीट,भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र. २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली
राज्यपालांचे सचिव

मुख्य मंत्र्यांचे अपर मुख्य सचिव
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
मंत्रालयीन सर्व विभाग

सर्व विभागीय आयुक्त

संचालक,तांत्रिक प्रशिक्षण,द्वारा-तंत्र शिक्षण संचालक, मुंबई (२५० प्रती)
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी १० प्रती)
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी १० प्रती)
सर्व जिल्हा परिषदांचे शिक्षणाधिकारी
आयुक्त महानगरपालिका, नागपूर
प्रशासकीय अधिकारी, पश्चिम महाराष्ट्रातील नगरपालिका शिक्षणमंडळे (पुणे/कोल्हापूर /सोलापूर या महानगरपालिकांची शिक्षण मंडळे यांसह)
मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका

कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी / देहू रोड/ देवळाली/अहमदनगर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
संचालक,आदिवासी कल्याण महाराष्ट्र राज्य,नाशिक(१० प्रती)
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे (१० प्रती)
संचालक,आदिवासी संशोधन व शिक्षण संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे
आदिवासी विकास आयुक्त, नाशिक

H-934-(10,000+20-11-03) 13अ

मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
* सहसंचालक, ऑल इंडिया इन्स्टिटयुट ऑफ लोकल सेल्फ गव्हर्नमेंट, मुंबई
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२० प्रती)
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मंत्रालयमुंबई(२० प्रती)
नगर विकास विभाग, युडी-१० मंत्रालय, मुंबई (२० प्रती)
कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास, मत्स्यव्यवसाय विभाग (२० प्रती)
आदिवासी विकास विभाग (२० प्रती)
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

मुख लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/ नागपूर/औरंगाबाद/नाशिक / अमरावती
जिल्हालेखापरीक्षाअधिकारी,स्थानिक निधी हिशेब,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी,जिल्हा अहमदनगर
जिल्हा लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब,कोकण कृषि विद्यापीठ,दापोली, जिल्हा रत्नागिरी
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (२५ प्रती)
उच्च शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य , पुणे (२५ प्रती)
कला संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई ( ४० प्रती)
संचालक,तंत्र शिक्षण , महाराष्ट्र राज्य, मुंबई (१०० प्रती)

सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
अपर आयुक्त, आदिवासी उपयोजना, नाशिक / नागपूर
सर्व समाजकल्याण अधिकारी, वर्ग-१
सर्व आदिवासी कल्याण अधिकारी
सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मिकृत आदिवासी विकास प्रकल्प
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी

कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला
कुलसचिव,कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी
कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे

कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर
कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती

कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव

अधीक्षक, वेतन पथक,सर्व जिल्हे
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई (उत्तर, दक्षिण व पश्चिम विभाग)
सर्व कन्याशाळा निरीक्षिका
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
शिक्षण अधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका
संचालक,नगरपालिका प्रशासन, मुंबई.
सर्व प्रादेशिक संचालक, नगरपालिका प्रशासन
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड फाईल, वित्त विभाग- सेवा-५

*पत्राद्वारे

H-934-(10,000-11-03)2

घरभाडे भत्ता व स्थानिक पूरकभत्ता प्रयोजनार्थ शहरांचे/ गावांचे पुनर्वर्गीकरण .

---

स्पष्टीकरण-

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग

शासन परिपत्रक क्र. घभाम-1098/सीआर-62/एसईआर-5,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 15 फेब्रुवारी, 1999

पहा:- शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.घभाम-1098/प्र.क्र.82/98/सेवा-5,दिनांक 11डिसेंबर,1998.

<u>**परिपत्रक**</u>

उपरिनिर्दिष्ट शासन निर्णयासोबतच्या जोडपत्रामधील शहरांच्या / गावांच्या वर्गीकरणानुसार शासकीय कर्मचाऱ्यांना घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता सध्या अनुज्ञेय आहे. हे वर्गीकरण केंद्र शासनाने दर दहा वर्षांने होणाऱ्या जनगणनेच्या आधारे लोकसंख्या हा निकष मानून घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्त्याचे दर सुधारित करण्याच्या प्रयोजनार्थ केलेले असून ते राज्य शासनाने याच प्रयोजनार्थ स्वीकारले आहे.

राज्य शासनाने प्रशासनिक दृष्टीकोनातून केलेल्या नगरपालिकांच्या वर्गीकरणाच्या आधारे काही नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडून देखील कर्मचाऱ्यांना सुधारित दराने घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता देता येईल किंवा कसे याबाबत या विभागाकडे विचारणा केली जात आहे व काही ठिकाणी नजरचुकीने नगरपालिकांच्या सुधारित वर्गीकरणानुसार सदर भत्ते दिले जाण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही. याबाबत शासन आता असे निदेश देत आहे की, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता यासाठी वर नमूद केल्याप्रमाणे करण्यात आलेले शहरांचे / गावांचे वर्गीकरण व शासनाचे प्रशासनिक दृष्टीकोनातून केलेले नगरपालिकांचे वर्गीकरण या दोन भिन्न बाबी असल्यामुळे त्या आधारे, उक्त भत्ते सुधारित दराने, नगरपालिकांच्या पुनर्वर्गीकरणानंतर तेथे दिले जात असल्यास ते त्वरित बंद करण्यात यावेत. घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेयतेच्या प्रयोजनार्थ,केंद्र शासनाच्या शहरे व गावांच्या वर्गीकरणाच्या आधारे विनिर्दिष्टपणे निर्गमित केलेल्या शहरांच्या / गावांच्या वर्गीकरणासंबंधीच्या आदेशानुसारच सदर भत्ते प्रदान करण्यात यावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श. वि. लागवणकर,
शासनाचे उपसचिव, वित्त विभाग.

——×o×——

H-934-(10,000+20-11-03)23T